राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत (पीआयपी) २०१९-२० वर्षातील योजनानिहाय मंजुर अनुदानातील Free Medicine योजनेंतर्गत NHM Free Drugs Services लेखाशिर्षानूसार शिल्लक राहिलेल्या अनुदानातून औषधे व औषधी साहित्य खरेदी निविदा प्रक्रियेद्वारे करण्यास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२०/प्र.क्र.०५/आरोग्य-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : १० फेब्रुवारी, २०२०.

**वाचा :-**

१) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/खरेदीकक्ष/सन २०१९-२० रा.आ.अभियान-अनुदान/फ्री मेडीसीन योजना-उर्वरित निधी/औषधे व साहित्य खरेदीस प्रशा.मान्यता/१४८-१५१/२०२०, दिनांक २० जानेवारी, २०२०.

२) आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्याकडील दिनांक १४ जानेवारी, २०२० रोजीची मान्य टिप्पणी.

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील पीआयपी अंतर्गत केंद्र शासनाने वार्षिक अंमलबजावणी कृती आराखडयानूसार मंजूर केलेल्या अनुदानातून राज्यातील विविध आरोग्य कार्यक्रम प्रमुखांकडून प्राप्त प्रस्तावानूसार Free Medicine योजनेंतर्गत औषधे व औषधी साहित्य खरेदी करण्यात आल्यानंतर शिल्लक राहिलेल्या अनुदानातून अंदाजित रक्कम ६६७.५९ लक्ष इतक्या रकमेच्या खर्चाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत प्रस्ताव या नस्तीवर विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०१९-२० च्या वार्षिक कृती आराखडयात Free Medicine योजनेंतर्गत NHM Free Drugs Services FMR Code ६.२.२१.१ या लेखाशिर्षाखाली रक्कम रु.२०५२२.९१ लक्ष इतके अनुदान मंजुर करण्यात आलेले आहे. सदर मंजुरी देताना सदर अनुदानात रु.७००.०० लक्ष FMR Code ६.२.१९.६,

रु.३९५०.०० लक्ष FMR Code ६.२.२२.१ व रु.६९३.९१ लक्ष FMR Code ६.२.२.१ या घटकातील अनुदानाचा समावेश दर्शविण्यात आलेला आहे. त्यानुसार सदर अनुदानातून राज्यातील विविध आरोग्य कार्यक्रम प्रमुखांनी योजनानिहाय विविध बाबींसाठी प्रस्ताव सादर करुन शासनाकडून प्रशासकीय मान्यता घेतलेली आहे. तसेच रु.४००.०० लक्ष इतके अनुदान हाफकिन फार्मा सिटीकल्स संस्थेकडील झालेल्या निविदेच्या दरानुसार हिमोफिलिया/ थॅलेसेमिया रुग्णांच्या औषधी खरेदीकरीता राखीव ठेवण्यात आलेले आहे. त्यानंतर NHM Free Drugs Services या लेखाशिर्षातून शिल्लक राहिलेल्या रु.९६१.१२ लक्ष अनुदानातून सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिनस्त आरोग्य संस्थांकरीता नव्याने निर्धारित केलेल्या एस.डी.एल. व एस.सी.एल. सूचीमध्ये अंतर्भाव असलेल्या अत्यावश्यक औषधे (ई.डी.एल.) व औषधी साहित्याची अंदाजित रक्कम रु.६६७.५९ लक्ष रकमेची खरेदी करण्याकरीता प्रशासकीय मान्यता मिळण्यास्तव प्रस्ताव शासनाकडे सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई यांनी सादर केलेला आहे.

सदर प्रस्तावास आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी मान्यता दिल्यानुसार सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत Free Medicine योजनेखाली NHM Free Drugs Services FMR Code ६.२.२१.१ या लेखाशिर्षान्वये उपलब्ध/ शिल्लक असलेल्या अनुदानातून सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिनस्त आरोग्य संस्थांकरीता नव्याने निर्धारित केलेल्या एस.डी.एल. व एस.सी.एल. सूचीमध्ये अंतर्भाव असलेल्या अत्यावश्यक औषधे (ई.डी.एल.) व कझ्युमेबल्स साहित्याची खरेदी अंदाजित रु.६६७.५९ लक्ष रकमेच्या निविदा प्रक्रियेस खालील विवरणपत्रातील प्रस्तावास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्याबाबत प्रस्तावित करण्यात येत आहे.

## परिशिष्ट-अ (अनुदानाचा तपशिल)

Amt.(In Lakhs)

| Year 2019-20 FMR Code | Budget Approved | Procurement Status | Remaining Budget |
|---|---|---|---|
| 6.2.21.1 NHM Free Drugs Services | **Rs.20522.91 Lakhs** with including Rs.700.00 Lakhs from FMR 6.2.19.6 Rs.3950.00 Lakhs from FMR 6.2.22.1 Rs.693.91 Lakhs from FMR 6.2.2.1 | Govt. A.A. Received Rs.18113.52 Lakhs Dt.16.09.2019 | **Rs.961.12 Lakhs** |
| | | Govt. A.A. Received Rs.693.84 Lakhs Dt.15.06.2019 | |
| | | Rs.354.43 Lakhs Proposal from Jt. Director (PC) Mumbai Dt.16.09.2019. Under Process for Govt.AA | |
| | | Amt. Rs.400.00 Lakhs secured for purchase for Haemophilia Drugs on HBPCL Tenders. | |
| | | **Total Amt.Rs.19561.79 Lakhs** | |

# परिशिष्ट-ब (खरेदी बाबींचा तपशिल)

| Sr. No. | EDL/ SDL/ SCL | Drug Name | Specification | Approx Rate Rs. | Qty | Amount Rs. |
|---|---|---|---|---|---|---|
| | SDL | Inj. Anti Diptheria Serum (ADS) | Inj. Anti Diptheria Serum Enzyme Refined Equine globulin solution 10,000 IU, 1 Vial of 10ml | 975.26 | 550 | 536393 |
| 2 | SDL | Inj. Anti Rabies Serum (ARS) | Inj. Anti Rabies Serum Enzyme Refined Equine Immunoglobulins 5ml Potency not less than 300 IU/ Ml, 1 Vial of 5ml | 278.23 | 22000 | 6121060 |
| 3 | SDL | Inj. Anti Tetanus Serum (ATS) | Inj. Anti Tetanus Serum Enzyme Refined Equine globulin solution 10000 IU/3.4ml Vial | 284.39 | 1600 | 455024 |
| 4 | EDL | Inj. Ceftriaxone 1gm | Inj. Ceftriaxone 1000 mg Vial | 13.22 | 480000 | 6345600 |
| 5 | EDL | Acyclovir Tab 400 mg | Tab. Acyclovir 400 mg, Strip of 10 Tablets | 2.37 | 800000 | 1896000 |
| 6 | EDL | Amoxycillin + Clavulanic Acid Inj 250 mg + 50 mg Vial | Inj. Amoxycillin + Clavunic acid 300mg<br>Inj. Amoxycillin Sodium 250 mg + Clavuanic acid as Potasium salt 50 mg i.e. 300 mg (0.3 gm) in Vial | 9.58 | 600000 | 5748000 |
| 7 | EDL | Cap. Mefenamic Acid 250mg | Cap. Mefenamic Acid 250mg, Strip of 10 Tablets | 1.50 | 500000 | 750000 |
| 8 | EDL | Cefoperazone and Sulbactum for Inj 1 gm, 1 gm Vial | Inj. Cefoperazone+Salbactum1gm<br>Inj. Cefoperazone sodium 500 mg + Sulbactum Sodium 500 mg USP i.e. 1gm | 16.31 | 400000 | 6524000 |
| 9 | EDL | Diclofenac Pottassium Suppository 100 mg Tab | Diclofenac Pottassium Suppository 100 mg Tab | 2.48 | 680000 | 1686400 |
| 10 | EDL | Fusidic Acid Cream 10 gm | Fusidic acid 2% w/w - 10 gm (Fusidic acid 20mg per gm) | 6.20 | 200000 | 1240000 |
| 11 | EDL | Hydrogen Peroxide 11 % + Silver Nitrate 1% | Hydrogen Peroxide 11% with Silver Nitrate 0.01 %, 1000ml Bottle | 145.00 | 20000 | 2900000 |
| 12 | EDL | Sy. Amoxycillin Trihydrate 250 mg / 5 ml- Bottle of 60 ml | Sy. Amoxycillin Trihydrate 250 mg / 5 ml- Bottle of 60 ml | 9.85 | 200000 | 1970000 |
| 13 | EDL | Tab. Diphenylhydantoin 100mg | Tab. Diphenylhydantoin 100mg, Strip of 10 Tablets | 1.44 | 1700000 | 2448000 |
| 14 | EDL | Thiocolchicosid Tab 4 mg | Thiocolchicosid Tab 4 mg, Strip of 10 Tablets | 1.05 | 500000 | 525000 |
| 15 | EDL | Labetalol Tab 100mg | Tab. Labetlol HCL 100 mg, Strip of 10 Tablets | 1.10 | 500000 | 550000 |
| 16 | EDL | Sodium bicarbonate Inj 7.5 % 10 ml | Sodium bicarbonate Inj 7.5 % 10 ml | 6.66 | 160000 | 1065600 |
| 17 | SDL | Feracrylum 1% Gel 15gm Tube | Feracrylum 1% Gel 15gm Tube | 38.90 | 250000 | 9725000 |

| Sr. No. | EDL/ SDL/ SCL | Drug Name | Specification | Approx Rate Rs. | Qty | Amount Rs. |
|---|---|---|---|---|---|---|
| 18 | SDL | Omeprazole Powder Sachet 20gm | Omeprazole Powder for Oral Suspension (Sodium Bicarbonate as Buffer) 5.9gm Sachet | 8.50 | 680000 | 5780000 |
| 19 | SDL | Capsule Amino Acids | Capsule Amino Acids<br>Each Contains : Isoleucine 67mg, Leucine 101mg, Phenylalanine 68mg, Valine 86mg, Methionine 59mg, L-lysine 105mg, L-threonine 53mg, L-tryptophan 23mg, L-histidine 38mg, L-tyrosine 30mg, Nitrogen 36mg | 5.49 | 680000 | 3733200 |
| 20 | SCL | C.T, Scan Films 14 X 17(Depending on the Camera) | C.T,Scan Films. (Wet & Dry) C.T. Scan Films. (Wet & Dry)<br>(1) C T & M I R Films for Dry Camera Should have compatibility of Films to available camera (14" x 17”) Should be quoted separately for Each camera.<br>(2) C T & M I R Films for Wet Camera Should have compatibility of Films to available camera (14" x 17") Should be quoted separately for Each camera | 103.06 | 10000 | 1030600 |
| 21 | SCL | ECG Roll | Wax coated electro cardi graphic paper size 50 mm x 30mm or 60mmx20mm (superior quality) | 51.48 | 35000 | 1801800 |
| 22 | SCL | ECG/EEG Gel | ECG Jelly Tube<br>Electrode contact paste suitable for ECG, EEG, ECT Jar of 200 gm | 58.60 | 25000 | 1465000 |
| 23 | SCL | Urine Collection Bag | Urine Collection Bag - Disposable sterile with accurate calibration Non Toxic, Tube length 42"Manufactured from clinical grade PVC sheet.<br>Super Smooth kink resistant tube, made from medical grade PVC. with connector.<br>Non return valve and drainage outlet.<br>Provided with hanging & carrying system.<br>Capacity : 2000 ml. Approx.<br>Sterile / Disposable / Individual packed. | 9.85 | 250000 | 2462500 |
| | | | | | **Total** | **66759177** |

## अटी :-

१) सदर आवश्यक औषधे व औषधी साहित्य या बाबींची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू आवश्यक औषधे व औषधी साहित्य या बाबींचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच याबाबींची खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे GEM Portal, इतर राज्यांचे दरकरार, National Pharmaceutical Pricing Authority (NPPA), National Medical Devices Authority (NDMA) यांच्याकडील उपलब्ध असलेल्या न्युनत्तम दर विचारात घेण्यात यावेत. तसेच हाफकिन संस्थेतील सदर बाबींची खरेदी केली जात असल्यास अथवा झालेली असल्यास निविदेत प्राप्त झालेले न्युनत्तम दर निविदेकरीता मागणी नोंदवितांना औषधी, औषधी साहित्य व उपकरणांच्या संदर्भात अंदाजित दर म्हणून नोंदविण्यात यावेत व खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) सदरहू खरेदीसाठी होणारा खर्च राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत केंद्र शासनाने मंजूर केलेल्या वार्षिक अंमलबजावणी कृती आराखडा सन २०१९-२० नुसार FMR Code 6.2.21.1 अंतर्गत उपलब्ध/ शिल्लक असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

८) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी. याबाबतची संपूर्ण जबाबदारी कार्यक्रम प्रमुखांची राहील.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

११) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

१२) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी -२०१६/प्र.क.२४०/ आरोग्य-८ दिनांक २६ जुलै, २०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

उपरोक्त अनुक्रमांक १ ते १२ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई, संचालक (आरोग्य सेवा), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई, सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 202001301410395417 असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2020.02.10 15:38:22 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
३) अतिरिक्त संचालक (आरोग्य सेवा), राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
४) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
५) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
६) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
७) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
८) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
९) निवडनस्ती (आरोग्य-७)